देवस्थान व्यवस्थापन समिती, पश्चिम महाराष्ट्र कोल्हापूर सुधारित आकृतीबंधास मंजुरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्र. डीएमसी -२०१४/९९७/प्र.क्र.६१(भाग-१)/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ जानेवारी, २०१९.

**संदर्भ:-**
१) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र.१९९६६/P, दि. १७ ऑगस्ट, १९७३.
२) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. १४७४१/P, दि. २९ जून, १९७२.
३) सचिव,देवस्थान व्यवस्थान समिती, पश्चिम महाराष्ट्र,कोल्हापूर यांचे पत्र दि. ९.८.२०१४

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र. १ व २ येथील अनुक्रमे दि. १७ ऑगस्ट, १९७३ व दि. १९ जून, १९७२ रोजीच्या शासन निर्णयान्वये देवस्थान व्यवस्थापन समिती,पश्चिम महाराष्ट्र, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील देवस्थानांचे व्यवस्थापन करण्यासाठी आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. देवस्थान व्यवस्थापन समितीकडे कोल्हापूर, सांगली व सिंधुदुर्ग जिल्हयातील सुमारे ३०६७ मंदिरांचे व्यवस्थापन आहे. दरम्यानच्या कालावधीत देवस्थान व्यवस्थापन समितीच्या कामकाजात प्रचंड वाढ झाली आहे. समितीच्या नियंत्रणाखाली अंदाजे २५ हजार एकर जमीन आहे. लागण, लिलाव, भुईभाडे वसुल करणे, जमिनीचे व्यवस्थापन करणे, दानपेटीची मोजणी करणे, विविध उत्सवांचे नियोजन करणे, उपसमितींच्या कामावर नियंत्रण ठेवणे, देणग्यांचा हिशोब ठेवणे तसेच समितीच्या नियंत्रणाखाली असलेल्या जमिनीचे प्रत्यक्ष भेट देऊन पाहणी करणे, अशा जमिनींच्या नोंदीचा शोध घेणे इत्यादी कामांसाठी कर्मचाऱ्यांची नितांत आवश्यकता आहे. सदर बाबींचा विचार करता संदर्भाधीन क्र.३, दि.०९.०८.२०१४ रोजीच्या पत्रान्वये सचिव, देवस्थान व्यवस्थापन समिती, यांनी सुधारित आकृतीबंधास मान्यता देण्यास केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने देवस्थान व्यवस्थापन समिती, कोल्हापूर, मुख्य कार्यालय व समितीच्या सावंतवाडी उप कार्यालयाच्या सुधारित आकृतीबंधास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

देवस्थान व्यवस्थापन समिती, पश्चिम महाराष्ट्र, कोल्हापूर या समितीच्या मुख्य कार्यालय व सावंतवाडी उप कार्यालयासाठीच्या सुधारित आकृतीबंधास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

मुख्य कार्यालय

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी | एकूण पदे |
|---|---|---|---|
| १ | सचिव | रु.१५६००-३९१००+ ग्रे. पे.रु.५४०० (प्रतिनियुक्तीद्वारे) | ०१ |
| २ | मालमत्ता अधिकारी | रु.१५६००-३९१००+ ग्रे. पे.रु.५००० (प्रतिनियुक्तीद्वारे) | ०१ |
| ३ | उप अभियंता | रु.९३००-३४८००+ ग्रे. पे.रु.५४०० | ०१ |
| ४ | लेखाधिकारी | रु.९३००-३४८००+ ग्रे. पे.रु.४३०० (प्रतिनियुक्तीद्वारे) | ०१ |
| ५ | सहायक सचिव | रु.९३००-३४८००+ ग्रे. पे.रु.४३०० | ०१ |
| ६ | लेखापाल | रु.९३००-३४८००+ ग्रे. पे.रु.४२०० | ०१ |
| ७ | कनिष्ठ अभियंता | रु.९३००-३४८००+ ग्रे. पे.रु.४३०० | ०२ |
| ८ | वरिष्ठ लिपिक | रु.५२००-२०२००+ ग्रे. पे.रु.२४०० | ०२ |
| ९ | रोखपाल | रु.५२००-२०२००+ ग्रे. पे.रु.१९०० | ०१ |
| १० | लिपिक | रु.५२००-२०२००+ ग्रे. पे.रु.१९०० | १५ |
| ११ | वाहन चालक | रु.५२००-२०२००+ ग्रे. पे.रु.१९०० | ०२ |
| १२ | रेकॉर्ड किपर | रु.४४४०-७४४०+ ग्रे. पे.रु.१६०० | ०१ |
| १३ | शिपाई तथा रखवालदार | रु.४४४०-७४४०+ ग्रे. पे.रु.१३०० | ०७ |
| | | **एकूण** | ३६ |

सावंतवाडी उप कार्यालय

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | एकूण पदे |
|---|---|---|---|
| ०१ | कार्यालय प्रमुख (वरिष्ठ लिपिक) | रु.५२००-२०२००+ग्रे.पे.रु.२४०० | ०१ |
| ०२ | लिपिक | रु.५२००-२०२००+ ग्रे.पे.रु.१९०० | ०३ |
| ०३ | शिपाई | रु.४४४०-७४४०+ ग्रे.पे.रु.१३०० | ०१ |
| | | **एकूण** | ०५ |

२. देवस्थान व्यवस्थापन निधीच्या उत्पन्नातून ज्यांचे वेतन अदा केले जाते असे व्यवस्थापन समितीच्या आकृतीबंधावरील पदांवर नियुक्त्या खालील अटीनुसार करता येतील.

(i) समितीच्या आस्थापनेवरील सचिव, मालमत्ता अधिकारी आणि लेखा अधिकारी ही पदे राज्य शासनाच्या सेवेतील अधिका-यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्यात यावीत.

(ii) समितीच्या कामकाजात झालेली वाढ विचारात घेता पद भरतीकरिता यापूर्वी निश्चित करण्यात आलेल्या अर्हतांचा आढावा घेऊन आकृतीबंधातील सर्व पदांचे सेवाप्रवेश नियम आणि नियुक्तीचा मार्ग निश्चित करण्याचा प्रस्ताव समितीने शासन मान्यतेस्तव सादर करावा.देवस्थान व्यवस्थापन समितीने शासनाच्या मान्यतेने तयार केलेले सर्व नियम सदर पदांना लागू होतील.

(iii) शासनाने समितीच्या आस्थापनेवर मंजुर केलेल्या आकृतीबंधातील कोणत्याही पदाचे पदनाम, वेतनश्रेणी आणि पदसंख्येत शासनाच्या मान्यतेशिवाय बदल करु नयेत तसेच सदर आकृतीबंधाबाहेर जावून अतिरिक्त पद भरती करु नये.

(iv) आकृतीबंधात नव्याने निर्माण केलेल्या व नामनिर्देशनाने भरण्यात येणाऱ्या पदावरील कर्मचारी एक वर्षाकरिता परिविक्षाधिन राहील. परिविक्षाधिन कालावधीत संबंधित कर्मचाऱ्याला पदाच्या वेतनश्रेणीच्या कमीतकमी टप्प्यावरील वेतन अनुज्ञेय राहील. अशा कर्मचाऱ्यांच्या कामाचे मुल्यमापन देवस्थान व्यवस्थापन समितीने केल्यानंतर आणि त्याला सेवेस पात्र ठरविल्यानंतर परिविक्षाधिन कालावधी संपुष्टात आणण्यात येईल आणि परिविक्षाधिन कालावधी समाप्ती नंतर संबंधित वेतनश्रेणी लागू करण्यात येईल.

(v) आकृतीबंधात समाविष्ट सर्व पदांवर कार्यरत असणाऱ्या अधिकारी आणि कर्मचाऱ्यांचे विहित कार्यपध्दतीप्रमाणे वार्षिक गोपनीय अहवाल लिहून जतन करणे बंधनकारक राहील.

(vi) सदर आकृतीबंधाद्वारे मंजुर करण्यात येणाऱ्या पदांना शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे निवृत्ती वेतन योजना लागू राहणार नाही. पदोन्नतीच्या पदावर कर्मचाऱ्यांना पदोन्नती देताना अशा पदाची अर्हता आणि कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल, कार्यक्षमता, कार्यतत्परता व चारित्र्य इ.बाबी समितीने विचारात घेऊन पदोन्नती द्यावी.

(vii) देवस्थान निधीवर कर्मचाऱ्यांची नियुक्त करताना समितीने संबंधित पदाची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या तसेच कर्मचाऱ्यांच्या सेवेची निकड विचारात घेऊनच नियुक्ती करावी. देवस्थान निधीवर कर्मचाऱ्यांची अनावश्यक व अतिरिक्त नियुक्ती केली जाणार नाही यांची पुरेपूर दक्षता सचिव तसेच देवस्थान व्यवस्थापन समितीने घेणे बंधनकारक राहील. संबंधित देवस्थानांमधील प्रथा आणि परंपरामध्ये होणाऱ्या बदलांचा आढावा घेऊन ज्या पदांची कालानुरुप आवश्यकता भासत नाही, अशा पदांवर भरती करु नये. तसेच देवस्थान निधीवर विवक्षित स्वरुपाच्या आणि कामाचा मर्यादीत कालावधी असणाऱ्या पदावर नियुक्त केल्या जाणाऱ्या कर्मचाऱ्यांना ठराविक वेतनश्रेणी न देता एकत्रित मानधन देण्यात यावे. देवस्थान निधीवर कोणत्याही परिस्थितीत अनावश्यक व अतिरिक्त कर्मचारी भरती केली जाणार नाही याची जबाबदारी सचिव आणि अध्यक्ष, देवस्थान व्यवस्थापन समिती यांच्यावर राहील.

(viii) देवस्थान निधीवर कर्मचाऱ्यांना नियुक्ती देताना संबंधित देवस्थानाचे उत्पन्न विचारात घेऊनच नियुक्ती देण्यात यावी तसेच देवस्थान निधीवर नियुक्त करण्यात येणाऱ्या कर्मचाऱ्यांचे कायमस्वरुपी दायित्व समितीवर येणार नाही याबाबत समितीने दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१३११५५५०७५३१२ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2019.01.31 16:05:57 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.

**प्रति:-** १) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) अध्यक्ष, देवस्थान व्यवस्थापन समिती, पश्चिम महाराष्ट्र, कोल्हापूर,
४) सचिव, देवस्थान व्यवस्थापन समिती, पश्चिम महाराष्ट्र, कोल्हापूर,
५) निवड नस्ती/का.१६.